उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील ए.एन.एम. व जी.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक येथील अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२५/प्र.क्र.१०४/पासु-२**
**१० वा मजला, संकुल इमारत,**
**गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई**
**तारीख: २८ मे, २०२५.**

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.२१३/आरोग्य-४, दिनांक ०७.१०.२०२४.
२) उपसंचालक, आरोग्य सेवा (शुश्रृषा), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/शुश्रृषा/कक्ष-९/टे-१/अपदे १० व २६//एएनएमजीएनएम/मालेगाव/२२४२-४४/२०२५, दिनांक ०७.०४.२०२५.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक : पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील ए.एन.एम. व जी.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक येथील अनुक्रमे १० व २६ अस्थायी पदांना दि.२८.०२.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर मुदतवाढ संपुष्टात आल्याने आणि सदर पदांची यापुढेही आवश्यकता असल्याने सदर पदांना दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील ए.एन.एम. व जी.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक येथील अनुक्रमे **१०** व **२६** अस्थायी पदांना पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या "परिशिष्ट-अ" मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील ए.एन.एम. व जी.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक येथील अनुक्रमे १० व २६ अस्थायी पदांना दिनांक दि.०१.०३.२०२५ ते दि.३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२५-२६ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मागणी क्रमांक आर -१ मुख्य लेखाशिर्ष "२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ११०-७- पंचवार्षिक योजनांतर्गत योजना- राज्य योजनांतर्गत योजना, (०६)(०१)- मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने (२२१० ०२२६)" |
| २ | मागणी क्रमांक आर-१ मुख्य लेखाशिर्ष "२२११-कुटूंब कल्याण, ००३-प्रशिक्षण, (०१) - कुटूंब कल्याण प्रशिक्षण - १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०२)-सहाय्यक परिचारीका प्रसाविका , दाई व आरोग्य प्रचारक या निमवैद्यकीय कर्मऱ्यांचे प्रशिक्षण (२२११ ०१११)" |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या "परिशिष्ट-अ" मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१४२७१८७७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: cn=MAHESH MADHUKAR LAD, o, ou, email=mahesh.lad@nic.in, c=US
Date: 2025.05.28 14:48:19 +05'30'

( महेश लाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई /नागपूर.

२) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

३) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) मुंबई.

४) उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.

५) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नाशिक.

६) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.

७) वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई

८) अवर सचिव / कार्यासन अधिकारी, (सेवा-१/सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-४)

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२५/प्र.क्र.१०४/पासु-२,
दिनांक २८.०५.२०२५ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | ए.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक | १० | ०० | प्राचार्य, गट-क (१ पद)<br>पाठयनिर्देशक, गट-क (५ पदे)<br>लिपिक, गट-क (१ पद)<br>गृहपाल/ वार्डन, गट-क (२ पदे)<br>शिपाई, वर्ग-४ (१ पद)<br>**(एकूण १० अस्थायी पदे)** |
| २ | जी.एन.एम. परिचर्या प्रशिक्षण महाविद्यालय, सामान्य रुग्णालय, मालेगाव, जि.नाशिक | २६ | ०० | प्राचार्य, वर्ग-३ (१ पद)<br>उप प्राचार्य, वर्ग-३ (१ पद)<br>पाठयनिर्देशक, वर्ग-३ (१४ पदे)<br>लघुटंकलेखक, वर्ग-३ (१ पद)<br>लिपिक, वर्ग-३ (१ पद)<br>ग्रंथपाल, वर्ग-३ (१ पद)<br>प्रयोगशाळा सहाय्यक, वर्ग-३ (१ पद)<br>गृहपाल/ वार्डन, वर्ग-३ (३ पदे)<br>शिपाई, वर्ग-४ (३ पदे)<br>**(एकूण २६ अस्थायी पदे)** |
| | **एकूण** | **३६** | **००** | **एकूण ३६ अस्थाई पदे** |

***********